राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा सन २०२१-२२ करिता पहिल्या हप्त्याचा निधी केंद्र हिस्सा रु. १४७.५० लक्ष व राज्य हिस्सा रु. ९८.३३ लक्ष असा एकूण रु. २४५.८३ लक्ष इतका निधी चालू वर्षी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत..

## महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आजाती-२०२१/प्र.क्र.३२३/३-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२२

वाचा -

१. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.९-२/२०२१-अेई(ई-९२७४७), विस्तार कक्ष, दि.२८.०१.२०२१
२. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.९-२/२०२१-अेई, विस्तार कक्ष, दि.०४.०३.२०२१
३. केंद्रीय वित्त मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.१(१३)पीएफएमएस/एफसीडी/२०२०,दि.२३.०३.२०२१
४. आयुक्त(कृषि), यांचे पत्र क्र. कृआ./आत्मा/SEWP २०२१-२२/मंजुरी/२७९/२१, दि.०१.०४.२०२१
५. संचालक(आत्मा), यांचे पत्र क्र. कृआ./आत्मा/SEWP/मंजुरी/३३२/२१, दि.११.०५.२०२१
६. वित्त विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि.०१/०७/२०२१
७. अवर सचिव(१४-अे),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.RKV-०१२०/C.R.१४/१४-A, दि.०२.०७.२०२१
८. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.७१/३-अे, दि.०७/०७/२०२१
९. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.७६/३-अे, दि.०५/०८/२०२१
१०. वित्त विभाग शा. नि. क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.१४/१०/२०२१
११. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/,विस्तार कक्ष, दि.२३.१२.२०२१
१२. संचालक(आत्मा) यांचे पत्र क्र.आत्मा/ /प्र.क्र.०१/ लेखा /पुराही/८३३/२१, दि.२८.१२.२०२१
१३. सा. न्या. व वि. स. विभाग शा. नि. क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.१०/अर्थसंकल्प(विघयो), दि.२८.०२.२०२२

प्रस्तावना -

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत ( NMAET) कृषि विस्तार उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानात राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात राबविण्यात येते. सदर योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन

दि. २८.०१.२०२१ व दि. ०४.०३.२०२१ पत्रांन्वये दिलेल्या सुचनांस अनुसरुन सदर योजनेचा एकूण रु. १२२१२.०२ लक्ष रकमेचा राज्य कृति विस्तार आराखडा (SEWP) कृषि आयुक्तालयाने उपरोक्त संदर्भाधीन दि.०१.०४.२०२१ रोजीच्या पत्रान्वये शासनास मान्यतेस्तव सादर केला होता. तथापि दि.१०.०५.२०२१ रोजी राज्य प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) च्या सभेत झालेल्या चर्चेनुसार अधिकारी / कर्मचारी प्रशिक्षण करिता वनामती, नागपूर यांना केंद्राकडून निधी उपलब्ध होत नसल्याने प्रशिक्षणाची निकड व आवश्यकता पाहता आत्मा योजनेतून सन २०२१-२२ मध्ये अधिकारी/कर्मचारी प्रशिक्षण करिता (बाब A-२ (a)) वाढीव तरतूद करण्यात आलेली आहे. त्यानुसार संदर्भाधीन दि.११/०५/२०२१ रोजीच्या पत्रान्वये संचालक(आत्मा) यांनी शासनास सादर केलेला एकूण रु. १२५१२.१३ लक्ष रकमेचा सुधारीत राज्य कृती विस्तार आराखडा (State Extension Work Plan) राज्य प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) मान्यतेने केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या मंजूरीसाठी सादर करण्यात आला होता. त्यानुसार सदर योजनेच्या अंमलबजावणीच्या वार्षिक कृति आराखड्यास संदर्भाधीन दि. ०७/०७/२०२० अन्वये प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने सन २०२१-२२ करिता आत्मा योजनेकरिता संदर्भाधीन दि. २३.१२.२०२१ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिश्याचा अनुसुचित जाती प्रवर्गासाठी रु. १४७.५० लक्ष निधी वितरीत केला आहे, त्यानुषंगाने समरुप राज्य हिश्याचा एकूण रु. ९८.३३ लक्ष वितरित करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक(आत्मा) यांनी संदर्भाधीन दि. २८/१२/२०२१ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

आत्मा अंतर्गत सन २०२१-२२ या अर्थिक वर्षात अनुसुचित जाती प्रवर्गाकरिता अर्थसंकल्पित लेखाशीर्ष **२४०१ B३०१** अंतर्गत केंद्र हिस्स्याकरिता रु.६००.०० लक्ष व लेखाशीर्ष **२४०१ B३१२** अंतर्गत राज्य हिस्स्याकरिता रु.४००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. तथापि कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने विहीत केल्याप्रमाणे सदर योजनेकरिता एकूण अर्थसंकल्पित निधीच्या फक्त ५० टक्केच्या मर्यादेत निधी उपलब्ध होईल. तथापि राज्य शासनाकडे प्रलंबित असलेल्या, सन २०२०-२१ च्या पुनर्जिवित निधी करिता, विभागाच्या संदर्भाधीन शा.नि. दि.०५.०८.२०२१ अन्वये, चालू वर्षी केंद्र हिश्श्याचा रु.३३१.८९ लक्ष व राज्य हिश्श्याचा रु.२०८.०७ लक्ष निधी वितरीत केलेला आहे.

त्यानुषंगाने संचालक(आत्मा) यांनी केलेल्या विनंतीस अनुसरुन, सन २०२१-२२ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान (आत्मा) या योजने अंतर्गत अनुसुचित जाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याकरिता केंद्र हिस्सा रु.१४७.५० लक्ष व राज्य हिस्सा रु.९८.३३ लक्ष असा एकूण रु.२४५.८३ लक्ष इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :**

१. सन २०२१-२२ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याचा केंद्र हिस्सा **रु. १४७.५० लक्ष ( रु. एक कोटी सत्तेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त)** व राज्य हिस्सा **रु. ९८.३३ लक्ष (रु. अठ्ठ्यानव लक्ष तेहतीस हजार फक्त )** असा **एकूण रु. २४५.८३ लक्ष (रु. दोन कोटी पंचेचाळीस लक्ष त्र्याएंशी हजार फक्त)** इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात आयुक्त(कृषि) यांना बीडीएस प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेकरीता प्रत्यक्ष वितरीत करण्यात येणा-या निधीच्या मर्यादेत योजनेची अंमलबजावणी करावी. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गाकरिताचा केंद्र हिश्श्याचा **रु. १४७.५० लक्ष (रु. एक कोटी सत्तेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त)** निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**(अ)** मागणी क्रमांक एन-३, २४०१ पीक संवर्धन,००, ७८९-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना,(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(२३), कृषि उन्नती योजना - कृषि विस्तार अभियान- विस्तार विषयक कामांत सुधारणा करण्याकरिता राज्याच्या विस्तार कार्यक्रमांना सहाय्य (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) ( अनुसूचित जाती) (२४०१ बी३०१), ३३ अर्थसहाय्य

३. तसेच केंद्र हिश्श्यास समरुप राज्य हिश्श्याचा **रु. ९८.३३ लक्ष (रु. अठ्ठ्यानव लक्ष तेहतीस हजार फक्त)** निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**(ब)** मागणी क्रमांक एन -३, २४०१ पीक संवर्धन,००, ७८९ - अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना ,(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(२४), कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार अभियान- विस्तार विषयक कामांत सुधारणा करण्याकरिता राज्याच्या विस्तार कार्यक्रमांना सहाय्य (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती) (२४०१ बी३१२), ३३ अर्थसहाय्य

४. सन २०२१-२२ मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५. आत्मा कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ साठी अनुसूचित जाती या प्रवर्गासाठी वितरीत करण्यात आलेला निधीचा केवळ त्याच प्रवर्गासाठी वापर करण्यात यावा.

६. सदर योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

७. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४५/२०२२/व्यय-१४, दि.२४.०१.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेच्या अधिन राहून निर्गमीत करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०३१२३३१६०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2022.03.03 12:36:52 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति** -

१.सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२.प्रधान सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य ),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३.आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय,पुणे
४.आयुक्त (समाजकल्याण), पुणे
५.संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय,पुणे
६.सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून )
७.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
८.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
१०.संचालक वनामती, नागपूर
११.उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१२.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६.कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८.महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१९.वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
२०.नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२१.कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२.निवड नस्ती (कार्यासन-३अे).